तुती लागवड कार्यक्रम हा केवळ मंजूर
केलेल्या समूहामध्येच राबविणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण १३१५/ प्र.क्र.३०/रेशीम कक्ष**
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक: १५ जुलै, २०१५

**वाचा :-** शासन पत्र क्रमांकः रेशीम १०११/ प्र.क्र.३९/ रेशीम कक्ष दि. ६ ऑगस्ट, २०११.

**प्रस्तावना -**

राज्यातील तुती लागवडीसाठी पोषक असलेले वातावरण विचारात घेता रेशीम उद्योगास मोठया प्रमाणात संधी व वाव आहे. यामुळे बाराव्या पंचवार्षिक योजनेमध्ये शासनाने तुती लागवडीच्या क्षेत्रामध्ये चार ते पाच पटीने वाढ करण्याचे निश्चित केले आहे

तुती लागवड कार्यक्रम हा २४ जिल्हयामध्ये राबविण्यात येतो. या कार्यक्रमाकरीता राष्ट्रीय कृषि विकास कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत Catalytic Development Programme ह्या योजनेंतर्गत निधी उपलब्ध करण्यात येतो. परंतु राज्यातील तुती लागवडीखालील क्षेत्राचा आढावा घेतला असता बरीचशी तुती लागवड ही निश्चित केलेल्या समुह क्षेत्राच्या बाहेर विखुरलेल्या स्वरूपात असून काही नविन समुह सुध्दा विकसित झालेले आहेत.

समुहाबाहेरील क्षेत्रात रेशीम शेती करणा-या शेतक-यांना तांत्रिक मार्गदर्शन व सोई सुविधा उपलब्ध करून देण्यास क्षेत्रीय कर्मचा-यांना अडचणी येत आहेत. त्यामुळे रेशीम शेतीचा विस्तार व विकास परिणामकारक पध्दतीने होत नसल्याचे दिसून आले आहे. यासाठी राज्यामध्ये तुती लागवड ते कोषोत्तर प्रक्रिया उद्योगाचा एकात्मिक विकास करणेसाठी समुह पध्दतीने तुती लागवड होणे आवश्यक आहे.

रेशीम लागवडीसाठी संदर्भाधीन दि. ६ ऑगस्ट, २०११ च्या पत्रान्वये राज्यात ४३ समुहाची निवड करण्यात आली. तथापि रेशीम उद्योगाचे सर्व पातळीवर संनियत्रण करणेसाठी शासनाने ऑनलाईन माहिती प्रणाली विकसीत केली असून या प्रणालीवर दि. ३० एप्रिल, २०१५ पर्यत अस्तित्वात असलेल्या समुहांची माहिती व त्यातील गावे भरण्याच्या सूचना क्षेत्रीय कार्यालयाना देण्यात आल्या. त्यानुसार ऑनलाईन माहिती प्रणालीवर ६४ समुहांची माहिती क्षेत्रिय कार्यालयाकडून भरण्यात आली आहे. राज्यातील तुती लागवड कार्यक्रम निश्चित केलेल्या वरील ६४ समुह क्षेत्रातच राबविणे व यासंदर्भातील मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

**शासन निर्णय -**

वर उल्लेख केल्याप्रमाणे तुती लागवड कार्यक्रम " रेशीम ऑनलाईन मॉनीटरींग संगणक प्रणाली " मध्ये नोंदविण्यात आलेल्या फक्त ६४ समुहामध्ये राबविण्यास शासन मान्यता देत आहे. यापुढे ह्या समुहांबाहेर तुती लागवड करता येणार नाही. या अनुषंगाने मार्गदर्शक सुचना पुढीलप्रमाणे राहातील :-

१) तुती लागवड कार्यक्रम समुहामध्ये राबविण्यासाठी व्यापक प्रसिध्दी व जनजागृती करण्यात यावी.

२) केंद्रीय रेशीम मंडळाने समुह विकास कार्यक्रमाबाबत मार्गदर्शक सुचना निर्गमित केलेल्या आहेत. त्या धर्तीवर समुहामध्ये तुती लागवड कार्यक्रम राबविण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी. त्याकरीता क्षेत्रीय कार्यालयास तश्या सुचना देण्यात याव्यात.

३) शासनाने निश्चित केलेल्या ६४ समुहाव्यतिरिक्त समुह पध्दतीने तुती लागवड करणेबाबत अर्ज प्राप्त झाल्यास या नवीन समुहाचा स्वतंत्र प्रस्ताव शासनाच्या मान्यतेकरीता सादर करणे आवश्यक राहील. शासनाच्या मान्यतेनंतरच त्या समुहात तुती लागवड करता येईल.

४) विहीत केलेल्या समुहातच तुती लागवड व्हावी म्हणून संचालक (रेशीम) व सहायक संचालक प्रादेशिक रेशीम कार्यालय यांनी संनियत्रण करावे.

५) या शासन निर्णयाच्या दिनांकापूर्वी समुहाबाहेर तुती लागवड केलेल्या शेतक-यांना सर्व प्रकारचे लाभ अनुज्ञेय राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१५१६०४०७६७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas Ramdas Thakur

Digitally signed by Vilas Ramdas Thakur
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=c8b1e52c5c4f922ab6eb7a0b44101c838aea34f29fbff0aebe9d85c3de3468c2, cn=Vilas Ramdas Thakur
Date: 2015.07.15 16:05:43 +05'30'

( वि.रा.ठाकूर )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (वस्त्रोद्योग) / मा.राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव.

२. अपर मुख्य सचिव ( कृषि व पणन) मंत्रालय, मुंबई .

३. प्रधान सचिव (रोहयो) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२

४. उपसचिव (कृषि) तथा सदस्य सचिव, राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

५. मा.आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे-४११००१.

६. आयुक्त (मनरेगा), महाराष्ट्र राज्य, नागपूर

७. सर्व विभागीय आयुक्त

८. सर्व जिल्हाधिकारी (बृहन्मुंबई व मुंबई उपनगरे वगळून)

९. मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व)

१०. संचालक (रेशीम) रेशीम संचालनालय, विभागीय आयुक्त कार्यालय परिसर, नागपूर

११.सर्व सहायक संचालक , प्रादेशीक रेशीम कार्यालय, पुणे, अमरावती, औरंगाबाद व अमरावती.

१२. सर्व जिल्हा रेशीम विकास अधिकारी श्रेणी-१/२

१३. रेशीम निवड नस्ती.